महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी
पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान
वितरीत करण्याबाबत.
खेड नगर परिषद, जि. रत्नागिरी

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ- २०१४/प्र.क्र.४१०/पापु.२२

गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १६ मार्च, २०१७

**वाचा :**

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२. २००८
३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ २०१२/प्र.क्र.७५५/पापु-२२, दि १८.५.२०१३
४. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण नागरी व ग्रामीण मंडळ, ठाणे यांचे पत्र क्र.मजीप्रा नावग्रायोमं/ठाणे/तांशा-४/२०९८/२०१३, दि.१८.६.२०१३
५. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ २०१४/प्र.क्र.४१०/पापु-२२, दि.२.९.२०१५

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक १८.५.२०१३ अन्वये खेड शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु. ९४,३३,७६०/- इतक्या किंमतीच्या सुधारणा कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण नागरी व ग्रामीण मंडळ, ठाणे यांनी संदर्भ क्र.४ अन्वये सदर योजनेच्या एकूण रु. ८८,१६,७९६.०० (निव्वळ) किंमतीच्या सुधारणा कामांस तांत्रिक मान्यता दिली आहे. शासन निर्णय, दिनांक १८.५.२०१३ प्रमाणे खेड नगर परिषदेने स्वहिश्श्याची संपुर्ण रक्कम बँक खात्यामध्ये जमा केली असून त्यानुषंगाने शासन निर्णय, दि. २.९.२०१५ अन्वये सदर योजनेस अनुज्ञेय अनुदानापैकी रु.४२,४५,१९२/- अनुदान खेड नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, खेड नगर परिषद यांनी दि.२३.१.२०१७ च्या पत्रान्वये एकूण रु.४९,२६,०४९/- रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. तसेच मंजूर

सुधारणा कामे १००% पुर्ण झाली असल्याबाबतचा उपविभागीय अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, उप विभाग, चिपळूण यांनी प्रमाणित केलेला भौतिक प्रगती अहवाल शासनास सादर केला असुन उर्वरित अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. मुख्याधिकारी, खेड नगर परिषद यांनी मंजूर कामांसाठी एकूण रु.८५,६६,५८४/- किंमतीची निविदा स्विकृत केली असल्याचे कळविले असल्याने योजनेची सुधारीत किंमत रु.९१,६६,२४५/- (शासन निर्णय, दिनांक १८.५.२०१३ अन्वये मंजूर ७% ई.टी.पी. चार्जेस रु.५,९९,६६१/- मिळवून) येत आहे. त्याप्रमाणे, खेड शहर पाणी पुरवठा योजनेस अनुज्ञेय असलेल्या रु.८२,४९,६२०/- अनुदानापैकी यापुर्वी वितरीत केलेले अनुदान रु. ४२,४५,१९२/- वजा जाता उर्वरित अनुदान रु.४०,०४,४२८/- खेड नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि. १८.५.२०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या खेड शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांकरीता अनुज्ञेय असलेल्या अनुदानापैकी उर्वरित अनुदान रुपये ४०,०४,४२८/- (रुपये चाळीस लाख चार हजार चारशे अठ्ठावीस फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपयांत)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासनाकडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| खेड, जि. रत्नागिरी | ९१,६६,२४५ | ८२,४९,६२० | ९,१६,६२५ | ९,४३,३७६ | ४२,४५,१९२ | ४०,०४,४२८ |
| | | | | | **एकुण रुपये** | ४०,०४,४२८ |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१६१५५७३८०५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

P G Kanade

Digitally signed by P G Kanade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=df264da0a5ae874f5305199856605acae2e37fcc52c47b710ce076124215ea20, cn=P G Kanade
Date: 2017.03.16 17:22:43 +05'30'

**( प्र. गि. कानडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

- मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
- मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
- प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल—१, मुंबई
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई
- जिल्हाधिकारी, रत्नागिरी
- संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- अध्यक्ष/मुख्याधिकारी, खेड नगरपरिषद, जि. रत्नागिरी
- जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, रत्नागिरी
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.